राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन
२०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी राज्य
हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत
(लेखाशिर्ष २२१५-२०७१)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१८/ प्र.क्र.७४/ पापु-१०**
जी.टी. हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीखः १५ जानेवारी,२०१९

वाचा -

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधे-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/ पापु-०७, दि.१७.०३.२०१०
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधे-१११४/प्र.क्र.२२/ पापु-०७, दि.०९.०७.२०१४
३) वित विभाग,शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

प्रस्तावना -

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम राज्यात राबविण्यात येत आहे. सन २०१८- १९ या आर्थिक वर्षात मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना- राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यकम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखली अंमलबजावणी यंत्रणांना निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणाऱ्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीकरिता रु.१०.०० कोटी इतके अनुदान महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना कव्हरेज या घटकासाठी अर्थसंकल्प प्रणालीव्दारे (BEAMS) पुढीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या कव्हरेज गावे/ वाडयांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/ वाडयांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये

शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे. अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचे आहे .

२) सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षतच खर्च होणे आवश्यक आहे. याची कृपया दक्षता घेण्यात यावी.

३) अंमलबजावणी यंत्रणानी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

४) या शासन निर्णयातील अटी व शर्ती राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे याची शासनाला खात्री करून घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर यांनी तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरिता अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखा पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून महाराष्ट्र जीवन प्राधिकरण संपुर्ण मदत व सुविधा पुरवतील.

५) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकास कार्यासन पापु-१०/ पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/ नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

६) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज या खाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च ५० टक्के केंद्र निधीतून व ५० टक्के राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

७) केंद्र व राज्य हिस्सयातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS प्रणालीवर घेण्याकरिता Nodal Officer नियुक्त करण्यात यावा. IMIS प्रणालीवर माहिती अद्ययावत न झाल्यास संबंधित Nodal Officer वर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

८) सदर निधी कृती आराखढयात समाविष्ट असलेल्या गावांच्या प्रगतीपथावरील योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करून देण्यात आलेला निधी उपयोगित आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे.

९) उपरोक्त निधी संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.०२.०४.२०१८ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. १०.०० कोटी (अक्षरी रुपये वीस कोटी मात्र) याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त) (श्री. यशवंत बाबुराव पाटील) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. व. भि. माने) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी

कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक (वित्त), (श्री. यशवंत बाबुराव पाटील) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री. व. भि. माने) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे जीवन प्राधिकरण यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

३. यावर होणारा खर्च क्र. वाय-२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना-राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम यासाठी अनुदाने (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ८ व क्र. ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११५१४४१५६०५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Gorakh Bharate

Digitally signed by Ravindra Gorakh Bharate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, serialNumber=fd232eb47eb633cb760c7bd2acf421b01b1da040dc965254760018b5f4e33be5, cn=Ravindra Gorakh Bharate
Date: 2019.01.15 16:39:11 +05'30'

**डॉ.रविंद्र भराटे**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महारष्ट्र-१-मुंबई/२- नागपुर,
२. आदिवासी विकास विभाग,कार्यासन-६/१४, मंत्रालय, मुंबई,
३. आयुक्त आदिवासी विकास, नाशिक,
४. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास , कोकण/ नाशिक/ नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, मुंबई,
८. संचालक (वित्त) ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
१०.पापु-०४/२०/२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
१२.निवडनस्ती पापु-१०.

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिस्स्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत (लेखाशिर्ष २२१५-२०७१) -शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१८/ प्र.क्र.७४/ पापु-१० चे विवरणपत्र

| अ.क्र. | विभाग | योजनेचे नाव | निधी |
|---|---|---|---|
| १ | सोलापूर | भोसे | १९.५४ |
| २ | | सुधारित अकलूज | ३५.३९ |
| ३ | | करकंब | ११७.७५ |
| ४ | गोंदिया | गोबरवाही | ४.२६ |
| ५ | चंद्रपूर | वाढीव गडचांदूर | १४.४६ |
| ६ | बुलढाणा | जळगांव जामोद | १५.४४ |
| ७ | | देऊळगांव घाट | ४५.०० |
| ८ | | रोहिणखेड | २३६.१२ |
| ९ | नाशिक | पुरक बारागांव पिप्री | ११.०८ |
| १० | | नांदगाव व चांदवड | १५.५६ |
| ११ | | मीठसागरे पांचाळे | ४.७२ |
| १२ | नागपूर | नागपूर पेरी अर्बन | ७.९७ |
| १३ | | तिष्टी | ०.२७ |
| १४ | अहमदनगर | लोणी | १९३.२८ |
| १५ | वाशिम | रिठद | ५.५६ |
| १६ | | किन्हीराजा | २.१५ |
| १७ | | पाडीटाकमोर | ६१.४५ |
| १८ | संगमनेर | शेणीत | ५.०२ |
| १९ | नागपूर जल. | वाडी | ३७.१५ |
| २० | पुणे | वडगांव रासई | ९७.१७ |
| २१ | | हिंजवडी | १.६० |
| २२ | | मंचर | २.७७ |
| २३ | कराड | सैदापूर | १०.१५ |

| | | | |
|---|---|---|---|
| २४ | ठाणे | वांगणी | १२.७२ |
| २५ | उर्वरित रक्कम योजनेच्या ई.टी.पी. चार्जसकरिता वापण्यात यावी. | | ४३.४२ |

Ravindra Gorakh Bharate

Digitally signed by Ravindra Gorakh Bharate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, serialNumber=fd232eb47eb633cb760c7bd2acf421b01b1da040dc965254760018b5f4e33be5, cn=Ravindra Gorakh Bharate
Date: 2019.01.15 16:40:01 +05'30'

**डॉ. रविंद्र भराटे**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन